**जीवनविद्या मिशन, मुंबई आणि**
**ग्रामविकास विभाग यांच्या संयुक्त विद्यमाने**
**ग्रामसमृध्दी अभियान राबविणेबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण २०२१/प्र.क्र.२११/योजना-११**

बांधकाम भवन, २५, मर्झबान मार्ग,
फोर्ट, मुंबई-४०० ००१.
तारीख:- ०९ फेब्रुवारी २०२२

**प्रस्तावना :-**

जीवनविद्या मिशन ही थोर समाज प्रबोधक श्री वामनराव पै प्रणित सामाजिक व शैक्षणिक संस्था असून मागील ६५ वर्ष समाजातील सर्व स्तरातील अंधश्रध्दा निर्मूलन, व्यसनमुक्ती, पर्यावरण जागृती, सर्व प्रकारचे भेदभाव नष्ट करणे, स्त्री-सन्मान, शालेय विद्यार्थी व तरुण युवा यांना सुसंस्कारीत करुन देशाची भावी पिढी ही सामर्थ्यशाली घडावी यासाठी बाल व युवा संस्कार अभियाने, कार्यशाळा असे विविध प्रकारचे कार्य करत आहे. "हे जग सुखी व्हावे व हे राष्ट्र सर्व राष्ट्रांच्या पुढे प्रगतीपथावर जावे" या संकल्पापोटी समाजातील स्थित्यंतरानुसार जीवनविद्या मिशनचे आजीव विश्वस्त व मार्गदर्शक श्री.प्रल्हाद पै यांच्या नेतृत्वाखाली वरील कार्याबरोबरच शासनासोबत संयुक्त विद्यमाने ग्राहक संरक्षण अभियान, अवयव दान अभियान, विविध व्यसनांच्या दुष्परिणाबाबतची जागृती निर्माण करणे, याशिवाय महाराष्ट्रातील अविकसीत गावे दत्तक घेऊन त्या गावाचा सर्वांगिण विकास करणे व सर्वच बाबतीत दत्तक घेतलेली गावे आदर्श गाव बनविणे या उद्देशाने ग्रामसमृध्दी अभियान, तसेच शेतकरी आत्महत्या विरोधी कार्य आणि प्रबोधनाच्या माध्यमातून मानसिक सबलीकरण असे अनेकविध अभियाने जीवनविद्या मिशन अतिशय यशस्वीपणे राबवित आहे. विविध कार्पोरेट व सरकारी तसेच निमसरकारी कार्यालयांमध्ये अधिकारी व कर्मचारी यांच्यासाठी Enjoy Your Work, Stress Management, या विषयाबाबतच्या कार्यशाळा आयोजीत केल्या जातात. उपरोक्त कार्यशाळांमुळे कर्मचा-यांमध्ये सकारात्मक विचारसरणी निर्माण होते. देशाभिमान व समाजाप्रती कर्तव्य या भावना जागृत होतात. आपली नोकरी ही समाजाची सेवा असून देश उभारणीच्या कार्यास मदत आहे, या बद्दल त्यांना जागरुक केले जाते

"आपले राष्ट्र सर्वार्थाने पुढे जावे" या जीवनविद्या मिशनच्या संकल्पाचा एक भाग म्हणून ग्रामीण भागातील जनतेपोटी कृतज्ञतेची भावना बाळगत जीवनविद्या मिशन या संस्थेने २०१६ साली ६० वर्ष पुर्ण केली. त्या निमित्ताने या देशाचा केंद्रबिंदू असलेल्या खेडयांचा सर्वांगिण विकास व्हावा, यासाठी ६० गावे दत्तक घेतली असून त्यापैकी २० गावांमध्ये जीवनविद्या मिशनने कार्य सुरु केले आहे. त्यातील ४-५

गावांमध्ये अतिशय परिणामकारक बदल दिसत आहेत. त्यामुळे ग्रामविकास विभागाच्या सहकार्याने महाराष्ट्रातील अविकसित गावे दत्तक घेवून त्या गावाचा सर्वांगीण विकास करणे व ते गाव सर्वच बाबतीत आदर्श गाव बनविणे याकरिता ग्रामसमृध्दी अभियान राबविणेबाबतचा प्रस्ताव जीवनविद्या मिशनने शासनास सादर केला आहे. त्याअनुषंगाने जीवनविद्या मिशनकडून प्रस्तावित करण्यात आलेल्या ग्रामसमृध्दी अभियानाची रुपरेषा पुढीलप्रमाणे राहील.

**शासन निर्णय:-**

प्रत्येक गाव अधिकाधिक सुखी व समृद्ध करून प्रत्येक गाव सक्षम करत गावातील भौतिक विकासासाठी सरकारी, निमसरकारी तसेच खाजगी संस्थां, उद्योग समूहाचे आर्थिक सहकार्य मिळवून, गावातील भौतिक विकास कामे करण्याकरिता जीवनविद्या मिशन या संस्थेचे प्रशिक्षीत कार्यकर्ते हे कार्य करतील. ग्रामसमृद्धी अभियानाअंतर्गत सर्वात प्रथम त्या गावाचा घरोघरी जावून सर्व्हे करण्यात येईल. सर्व्हे केल्यानंतर त्याचा अभ्यास करून अहवाल तयार करुन त्यातून गावात प्राधान्याने करावयाच्या कामांची/ आव्हानांची यादी तयार करण्यात येईल. त्यानंतर ग्रामपंचायतीसोबत सभा घेऊन पुढील कार्याचे नियोजन करण्यात येवून यामध्ये प्रामुख्याने सर्वांगीण विकास साधण्यासाठी खालील उद्दीष्टांवर भर देऊन कार्य करण्यात येईल.

- स्वच्छ घर, स्वच्छ परिसर, हागणदारी मुक्त गाव.
- प्लास्टिक बंदी, शून्य कचरा मोहीम, घनकचरा व्यवस्थापन.
- गाव व आजूबाजूच्या परिसरात वृक्षारोपण व वृक्षसंवर्धन.
- स्त्री सन्मान, बेटी बचाव व बेटी पढाओ, महिला सक्षमीकरण
- महिला बचत गट यांना व्यवसायाभिमुख प्रशिक्षण व सरकारी योजनांचे मार्गदर्शन.
- गावागावांत रोजगार वाढीस लागावा व गावाकडून शहराकडे नोकरी किंवा व्यवसाय करण्यासाठी येणारा लोंढा स्थानिक पातळीवरच आपले अर्थार्जन करू शकेल, या उद्देशाने स्थानिक पातळीवर स्वयंरोजगार व व्यवसायाच्या संधी उपलब्ध करून देणे. आवश्यक असल्यास त्यांनी निर्माण केलेल्या वस्तूंना मार्केटिंग मिळवून देणे.
- शेतकरी वर्गाला संघटीत करून सेंद्रीय शेती करण्याचे प्रशिक्षण देणे व सेंद्रीय शेती, जोड धंदा, कुटीर उद्योग करण्यास प्रवृत्त करणे.
- सरकारी योजना (जिल्हा उद्योग केंद्र, MSME (Ministry of Micro, Small & Medium Enterprises), CMEGP (Chief Minister Employment Generation Programme), PMEGP (Prime Minister Employment Generation Programme) सर्व सामान्य जनतेपर्यंत पोहचविणे व राबविणे, शासकीय योजनांचा लाभ घेण्यासाठी प्रवृत्त करणे.

- ग्रामसमृध्दी अभियान अंतर्गत गावागावांमध्ये भौतिक विकास साधण्यासाठी सामाजिक दायित्व निधी (CSR) उपलब्ध करून देणे.
- नैसर्गिक साधनसंपत्तीचा पुरेपूर परंतू मोजका वापर करण्यास शिकवणे.
- संपूर्ण व्यसनमुक्त गाव.
- संपूर्ण अंधश्रध्दामुक्त गाव
- प्रत्येक घर सुखी करणे.
- संस्कार युक्त गाव.
- राष्ट्रभक्ती, राष्ट्रप्रेम आणि राष्ट्रहीत भावना वृध्दींगत करुन उत्कृष्ठ नागरीक घडवणे.
- गावांतील भौतिक विकास कामांना सरकारी योजना व उद्योग समुहांच्या सहकार्याने गती देणे इत्यादी.

**२. शासनाशी समन्वय / सहकार्य :**

१. प्रत्येक गावांमध्ये चालत असलेल्या सर्व सरकारी, निमसरकारी, खाजगी, शैक्षणिक संस्थामध्ये आठवडयातून एक तास प्रत्यक्ष किंवा ऑनलाईन पध्दतीने एक तास मानवी जीवनमूल्यांचे संस्कारयुक्त प्रशिक्षण शिबिर घेण्यासाठी वेळ उपलब्ध करून देण्याची कार्यवाही शिक्षण विभाग तसेच संबंधित कार्यालयांनी/संस्थांनी करावी.

२. ग्रामस्थ, व्यावसायिक, विद्यार्थी, पालक यांची वैचारिक मानसिकता बदलण्यासाठी जीवनविद्या तत्वज्ञानाचे मुल्यात्मक संस्कार शिक्षण ज्ञान, विविध आवश्यक विषयांवरील कार्यशाळा सर्व स्तरांपर्यत पोहचविण्यासाठी प्रत्येक ग्रामपंचायत, तहसील व जिल्हा कार्यालय, जिल्हा परिषद अंतर्गत संबंधीत कार्यालये व संस्था यांनी जीवनविद्या मिशनला सहकार्य करावे.

३. त्या-त्या गावात शासकीय योजनांची मदत घ्यावी लागणार असेल तर प्राधान्याने ग्रामसमृध्दी अभियानांतर्गत विचार होवून सर्व संबंधित अधिकारी/कर्मचाऱ्यांनी जीवनविद्या मिशनच्या कार्यकर्त्यांना सर्वोतोपरी योग्य ते सहकार्य करावे.

४. तसेच, ग्रामीण भागात C.S.R निधी देऊ इच्छिणा-या कंपन्यांशी समन्वय करुन ग्रामपंचायतीअंतर्गत विकास कामे पूर्ण करावीत.

३. ग्रामसमृध्दीचे कार्य करण्यासाठी जीवनविद्या मिशन संस्थेला शासनाची “सहयोगी मार्गदर्शक संस्था” म्हणून नियुक्त करण्यात येत आहे.

४. सदर अभियान राबविल्याने ग्रामस्थांच्या विचारसरणीत परिणाम कारक बदल होईल. कारण यामुळे गावातील प्रत्येकाचा मानसिक, आध्यात्मिक, आर्थिक आणि शारिरीक स्तर उंचावणार आहे.

त्यामुळे आपापसातील वैचारिक मतभेद कमी होऊन गावातील विकास कामावर भर राहणार आहे. तथापि, ग्रामीण भागातील जनतेला भारताच्या संविधानामधील नागरिकांचे मूलभूत हक्क, भाग ३ मधील समानतेचा हक्क, शोषणाविरुध्दचा हक्क आणि भाग-४ मधील अनुच्छेद ५१-क मूलभूत कर्तव्ये इ.बाबत माहिती जीवनविद्या मिशनकडून देण्यात यावी.

**जीवन विद्या मिशन, मुंबई या संस्थेच्या वतीने राबविण्यात येणाऱ्या ग्राम समृध्दी अभियांनासाठी येणारा खर्च सरकारी योजनेतून करता येणार नाही. त्यामुळे सदर खर्च जीवन विद्या मिशन, मुंबई या संस्थेने किंवा लोकवर्गणी मधून करावा.**

५. ग्राम समृध्दी अभियानाचे कार्य पद्धतशीरपणे यशस्वी होण्यासाठी आणि वरील सर्व उद्दिष्ट्ये साध्य करून प्रत्येक गावात शाश्वत विकास साधण्यासाठी जीवनविद्या मिशन यांना ग्रामीण भागात कार्य करण्यासाठी ग्राम पंचायत, पंचायत समिती व जिल्हा परिषद अंतर्गत कार्यरत सर्व विभागाचे समन्वयाने सहकार्य करण्यात यावे. तसेच सदर योजनांतर्गत जीवन विद्या मिशन यांच्या शिफारशीप्रमाणे जिल्हा परिषद अंतर्गत राबविण्यात येणाऱ्या योजनांच्या निकषांनुसार ग्रामपंचायतींची विकास कामे पूर्ण करण्यासाठी प्राधान्याने अनुदान उपलब्ध करुन देण्यात यावे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०२०९१४४३१८८५२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

MANOJ DATTATRAYA JADHAV

Digitally signed by MANOJ DATTATRAYA JADHAV
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=a83fc829949e9b1a022b031436c946028b48d51f5a1bf36ca3ce4fead857da72,
pseudonym=15CB48D6FC3DD16622D8A26F5F337DB98AC9A319,
serialNumber=2766AFDA86350272237DCF9A191545970F7F12E66D0605C664CA2BF0F3001DC0, cn=MANOJ DATTATRAYA JADHAV
Date: 2022.02.09 15:53:20 +05'30'

**( मनोज जाधव )**
**उपसचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. मा.राज्यपाल यांचे सचिव.
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.उपमुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा.मंत्री /राज्यमंत्री (ग्रामविकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा.विरोधी पक्ष नेता, विधान परिषद/विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ, मुंबई.
६. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
७. महालेखापाल, मुंबई/नागपूर

८. अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग, मुंबई.
९. जिल्हाधिकारी, सर्व
१०.मुख्य कार्यकारी, अधिकारी, जिल्हा परिषद, सर्व
११. मुख्य लेखाधिकारी, जिल्हा परिषद, सर्व
१२.जिल्हा कोषागार अधिकारी, सर्व.
१३.प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, सर्व
१४. श्री.विवेक बावकर, विश्वस्त सचिव, जीवनविद्या मिशन, ए/२, सिध्दार्थनगर, बि.नं.५ को.ऑप.हौ.सोसायटी, धीरज उपवनच्या समोर, वेस्टर्न एक्सप्रेस हायवेजवळ, बोरावली (पूर्व), मुंबई ४०० ०६६